**सोलापूर विद्यापीठातील विविध विभागातील शास्त्रीय उपकरणे ठेवण्यासाठी इमारती बांधकामास अनुदान मंजूर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
उच्च व तंत्रशिक्षण विभाग
शासन निर्णय क्र एसयूएस-२०१०/(४९/१०)/विशि-२
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २६ मार्च, २०१०

**वाचा :** १) शासन निर्णय उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र. एसयूएस-२००८/(३६४/०८)/विशि-५, दिनांक २५ मार्च, २००९

२) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.यूएनआय/यो./सोवि/विशि-१/७३९०, दि.२३.२.२०१०

**प्रस्तावना :** सोलापूर विद्यापीठ, सोलापूर या विद्यापीठातील विविध विभागांसाठी आवश्यक असलेली उपकरण ठेवण्यासाठी उपकरणे कक्ष इमारतीसाठी रु. १९,३२,४२९/- (रुपये एकोणीस लाख बत्तीस हजार चारशे एकोणतीस फक्त) इतक्या रक्कमेच्या खर्चास संदर्भीय क्र. १ च्या शासन निर्णय दि. २५ मार्च, २००९ अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. या इमारती बांधकामासाठी विद्यापीठास निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :** सोलापूर विद्यापीठ, सोलापूर या विद्यापीठातील उपकरणे कक्ष इमारत बांधकामास सोबत जोडलेल्या परिशिष्टात नमूद करण्यात आल्याप्रमाणे रु. १९,३२,४२९/- इतका खर्च अपेक्षित आहे. सदर तरतूदीमधून सोबतच्या परिशिष्टात दर्शविल्याप्रमाणे इमारत व अन्य बाबींकरीता रु. १९,३२,४२९/- (अक्षरी रुपये एकोणीस लाख बत्तीस हजार चारशे एकोणतीस फक्त) एवढा निधी वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. वरील अनुदानाची सर्व कागदपत्रे व हिशेब महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई किंवा प्रकरणपरत्वे महालेखापाल -२ नागपूर त्यांनी सदर कामाकरीता प्राधिकृत केलेले अधिकारी यांना तपासण्याचे अधिकार असून, त्यांनी मागणी केल्यास, सर्व कागदपत्रे त्यांच्याकडे तपासणी करीता विद्यापीठाने सादर केली पाहिजेत. विद्यापीठास ज्या उद्दिष्टासाठी मंजुर केलेल्या अनुदानाचा वापर त्याच उद्दिष्टासाठी करावा आणि त्याबाबतचे विनियोजन प्रमाणपत्र (Utilisation Certificate)संबंधितांना योग्य वेळी सादर करण्याची दक्षता घेण्यात यावी.

३. वरील खर्च चालू वर्षाच्या विद्यापीठास मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून तसेच खालील लेखाशीर्षातून भागविण्यात यावा :-

२२०२-सर्वसाधारण शिक्षण-०३-विद्यापीठीय व उच्च शिक्षण-१०२-विद्यापीठांना सहाय्य- पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (००)(१७)सोलापूर येथील नवीन विद्यापीठाचा विकास (२२०२ ३५२१)- ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) मागणी क्र.डब्ल्यू-२

४. हा शासन निर्णय, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग पहिला उप विभाग तीन मधील अ.क्र. ४-नियम क्रमांक २७(२) (अ) नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारान्वये आणि वित्त विभागाच्या शासन

निर्णय क्र. विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दि. १५ मे, २००९ अन्वये प्राप्त झालेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.govt.in या संकेत स्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१००३२७१८०५३७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(रा. गो. जाधव)
उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हील, मुंबई,
२) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
३) कुलगुरु, सोलापूर विद्यापीठ, सोलापूर
४) कुलसचिव, सोलापूर विद्यापीठ, सोलापूर
५) सहसंचालक ( उच्च शिक्षण) कोल्हापूर विभाग, कोल्हापूर.
६) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-१/२ महाराष्ट्र, मुंबई
७) महालेखापाल, (लेखा परीक्षण) -१/२ महाराष्ट्र, मुंबई
८) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/सोलापूर
९) नियोजन विभाग, (का-१४७१) मंत्रालय, मुंबई.
१०) वित्त विभाग,(व्यय-५) ( अर्थसंकल्प-३/८) मंत्रालय, मुंबई.
११) सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) मा. प्रधान सचिव,उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१३) उप सचिव (विशि), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१४) अवर सचिव (साशि-१), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,
१५) निवड नस्ती (विशि-२)

शासन निर्णय क्र. एसयुएस-२०१०/(४९/१०)/विशि-२, दि. २६ मार्च, २०१०
सोबतचे परिशिष्ट

| अ.क्र. | कामाचे नाव | रक्कम |
|---|---|---|
| १. | कामाची किमंत | रु. १३,७४,०३५/- |
| २. | किरकोळ खर्च | रु. ५४,९६१/- |
| ३. | संगणीकरण | रु. २७,४८१/- |
| ४. | विद्युत पुरवठा | रु. १,५१,१४४/- |
| ५. | बाहय पाणी पुरवठा | रु. १,०९,९२३/- |
| ६. | डी.एस.आर. किंमत (वाढ) | रु. १,३७,४०४/- |
| ७. | आराखडा नकाशा २% | रु. २७,४८१/- |
| ८. | बागकाम | रु. ५०,०००/- |
| | एकूण | रु. १९,३२,४२९.०० |
| | अक्षरी रुपये एकोणीस लाख बत्तीस हजार चारशे एकोणतीस फक्त. | |

My Documents\Nilima\G.R\४९.१० SUS.doc